~~२०१५०४२३१५२१५९४६२९~~ २०१५०४२३१५२२३७२०२७

२६३

कवठणी खारभूमी योजना ता. सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(२९०/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १०/०१/२०११

**पहावे :** मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/कवठणी/तां-२ (१) ४७२४, दि.७/७/२०१०

**प्रस्तावना :-**

कवठणी खारभूमी योजना ता. सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग, सदर खारभूमी योजनेचे नुतनीकरण प्रस्तावित असून ही योजना खारभूमी बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१ (CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. (१)कवठणी खारभूमी योजना ही सन १९८४ मध्ये बांधणेत आलेली असून या योजनेमध्ये फक्त एका उघाडीचा समावेश आहे. या योजनेमध्ये बांधाचा समावेश नाही. योजनेची उघाडी सुस्थितीत असून उघाडी नुतनीकरणाची आवश्यकता नाही. (२) कवठणी मुठयेवाडी खारभूमी योजना १९९० मध्ये पूर्ण करणेत आलेली असून सुमारे २० वर्षे जुनी आहे या योजनेमध्ये ५४० मी. लांबीचा बांध व एका उघाडीचा समावेश आहे. या योजनेची उघाडी सुस्थितीत व कार्यान्वित असून सततचे उधाणाने व पुरामुळे योजनेचे बांधाचे मोठया प्रमाणात नुकसान झाले आहे. या दोन्ही योजनांचे मधील सुमारे १.५० कि.मी. खाडी किनारी असलेला भाग उधाणाने तुटून सखल होवून या भागातून खारे पाणी दोन्ही योजनांचे पुनःप्रापित क्षेत्रात शिरत आहे. त्यामुळे या दोन्ही योजनांचे नुतनीकरण करताना या योजनांमधील १.५० कि.मी. लांबीचा भागासाठी खार बंधारा बांधणे आवश्यक आहे. या दोन्ही योजना व त्यामधील १.५० कि.मी. भाग मिळून एकच कवठणी खारभूमी योजनेच्या नुतनीकरणाचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये कवठणी खारभूमी योजना ता. सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रू.१,०९,१२,८८६/- (रुपये एक कोटी, नऊ लक्ष, बारा हजार, आठशे शहाऐंशी फक्त) यापैकी रू.९९,२०,८०५/- कामाप्रित्यर्थ व रू.९,९२,०८१/- अनुषंगिक खर्च रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता

प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र.संकीर्ण १०९९/१२९/९९/मो प्र (प्र) विनियम दि.१८.५.१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (०८/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(ज.प्र.जहागिरदार)
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
अर्थशाखा १/२ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(२९०/२०१०) खारभूमी दिनांक १०/०१/२०११ चे सहपत्र
कवठणी खारभूमी योजना ता. सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रूपयात |
|---|---|---|
| १ | "अ" प्राथमिक | ११९३१ |
| २ | "बी" भूसंपादन | -- |
| ३ | "सी" मुख्य कामे | ९०९०९१६ |
| ४ | "एफ" आर.एच.टी. वर्क्स | ७६२५६४ |
| ५ | "के" इमारती | -- |
| ६ | "एम" वृक्षारोपण | १०७६० |
| ७ | "ओ" संकीर्ण | २०००० |
| ८ | "पी" देखभाल | २४६३४ |
| ९ | "आर" दळणवळण | -- |
| | एकूण | ९९२०८०५ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ९९२०८१ |
| | **एकूण** | **१०९१२८८६** |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | ११५ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रू.९४,८९५/- |
| लाभव्यय गुणोत्तर | ४.०४ |
| दरसूची वर्ष | २००८-२००९<br>सा.बां.वि. २००९-२०१० |